**अधिनियमातील सुधारित तरतूदीच्या अनुषंगाने, थेट निवडून आलेल्या नगराध्यक्षांना विकास कामांच्या वित्तीय व संविदा मंजूरीचे अधिकाराबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१८/प्र.क्र.४५/नवि-१४,**
मंत्रालय, मुख्य इमारत (४ था मजला),
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक. २७ सप्टेंबर, २०१८

वाचा :- १. सन २०१८ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.२५, दि.३१.०३.२०१८.
२. शासन अधिसूचना क्र.एमसीओ-२०१८/प्र.क्र.४५/नवि-१४, दि.१४.०६.२०१८.

प्रस्तावना :-

नगरपरिषद/ नगरपंचायतीच्या कामकाजात गतिमानता, पारदर्शकता व लोकाभिमुखता आणण्याच्या दृष्टीने, संदर्भ क्र.१ येथील महाराष्ट्र विधेयक क्र.२५/२०१८ अन्वये महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ मध्ये सुधारणा करण्यात आल्या आहेत.

अधिनियमातील कलम ५८ पोटकलम (१अ) अन्वये, थेट निर्वाचित नगराध्यक्षांना राज्य शासनाकडून विहीत करण्यात येईल अशा विकास कामांच्या प्रस्तावांना मंजूरी देण्याचे व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या अनुदानातून प्रस्तावित विकास कामांना जेव्हा कोणत्याही विनिर्दिष्ट सुचना नसतील व परिषदेला कामे निवडण्याचा अधिकार असेल तेव्हा मंजूरी देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

तसेच, कलम ९३ पोटकलम २ च्या परंतुकाद्वारे, शासन वेळोवेळी विहीत करेल अशा प्रवर्गातील संविदांना मंजूरी देण्याचे अधिकार नगराध्यक्ष व मुख्याधिकाऱ्यांच्या समितीला देण्यात आले आहेत.

अधिनियमातील उपरोक्त सुधारणांच्या अनुषंगाने, संदर्भ क्र.२ येथील अधिसूचनेन्वये महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती (थेट निवडून आलेल्या नगराध्यक्षांना वित्तीय अधिकार) नियम, २०१८ अधिसूचीत करुन, थेट निवडीने निवडलेल्या नगराध्यक्षांना असणाऱ्या विकास कामांच्या व संविदा मंजूरीच्या अधिकारांचे प्रमाण व स्वरुप विहीत करण्यात आले आहे.

शासन निर्णय :-

अधिनियमातील सुधारणा व त्या अनुषंगाने, नियमांद्वारे विहीत केलेल्या तरतुदींबाबत क्षेत्रिय स्तरावर आवश्यक कार्यवाही होण्याच्या दृष्टीने, स्पष्टीकरणात्मक शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार, विहीत अधिकार खालीलप्रमाणे असतील: -

**१. थेट निवडून आलेल्या नगराध्यक्षांना असणारे विकास कामांच्या वित्तीय मंजूरीचे अधिकार: -**

अ) थेट निवडून आलेल्या नगराध्यक्षांना रू.१ कोटी पेक्षा कमी अंदाजपत्रकीय किंमत असणाऱ्या विकास कामांच्या प्रस्तावांना वित्तीय मंजूरी देण्याचे अधिकार असतील.

ब) तथापि, एका वित्तीय वर्षात अशा मंजूरी दिलेल्या विकास कामांच्या प्रस्तावाची किंमत ही शासकीय अनुदानाच्या १५ टक्के व विकास कामांसाठी निर्धारित केलेल्या नगरपरिषद निधीच्या १५ टक्के पेक्षा अधिक नसेल.

**२. थेट निवडून आलेल्या नगराध्यक्ष व मुख्याधिकारी यांच्या समितीला असणारे संविदा मंजूरीचे अधिकार: -**

अ) अधिनियम व लेखासंहितेतील तरतूदीनुसार विहीत पध्दतीने मागविण्यात आलेल्या व अंदाजपत्रकीय किंमती इतक्या अथवा त्यापेक्षा कमी दराने प्राप्त झालेल्या संविदांना नगराध्यक्ष व मुख्याधिकारी यांचा समावेश असणारी समिती, अशा संविदा मिळाल्याच्या दिनांकापासून पंधरा दिवसांच्या कालावधीच्या आत मान्यता देईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्राच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१८०९२७१३२३५२५८२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sachin Dattatray Sahasrabuddhe

Digitally signed by Sachin Dattatray Sahasrabuddhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7db996f7c088dbf2d76ad85484362957aab596e46ec268eca3b9822aa62fd32b, serialNumber=67648ad8c40ecf8d0f911eaf72d918202f02f540836a5f65e8b71c0a69d61291, cn=Sachin Dattatray Sahasrabuddhe
Date: 2018.09.27 13:39:52 +05'30'

**(सचिन सहस्त्रबुध्दे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति** :-

१. मा.विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२. सर्व सन्मानीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य
३. मा.राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव
४. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
५. सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. मा.मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
८. सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक
९. सर्व जिल्हाधिकारी
१०.राज्यातील सर्व नगरपरिषदा/ नगरपंचायतींचे नगराध्यक्ष
११.राज्यातील सर्व नगरपरिषदा/ नगरपंचायतींचे मुख्याधिकारी
१२.निवडनस्ती (नवि-१४)